राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन धारकांची सर्व प्रदाने कोषागारांमार्फत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः स्वासैनि २०१३/प्र.क्र.२१६ / स्वासैक-१**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ९ जून, २०१५

वाचा :-
१. शासन निर्णय, क्रमांकः , सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक स्वासैक- २०१३/प्र.क्र. २१६/ स्वासैक-१ दिनांक १०.१२. २०१४.
२. शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक स्वासैक-२०१३/प्र.क्र.२१६/ स्वासैक-१, दिनांक १५ डिसेंबर, २०१४
३. शासन परिपत्रक, क्रमांकः , सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक स्वासैक- २०१३/प्र.क्र. २१६/ स्वासैक-१ दिनांक ३१.३.२०१५.

## शासन निर्णय

राज्यातील राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतनधारकांना स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन व अन्य सवलतीबाबतची प्रदाने दि. १.४.२०१५ पासून कोषागारांमार्फत करण्याचा निर्णय शासनाने दि.१०.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये स्पष्ट केले आहे. यामुळे काही बँकांनी दि. १ एप्रिल, २०१५ पासून प्रदान थांबविले आहे व तसे शासनास/ जिल्हाधिकारी यास कळविले आहे. त्यामुळे तेव्हापासून स्वातंत्र्य सैनिकांचे प्रदान झालेले नाही. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, ज्या स्वातंत्र्य सैनिकांचे प्रदान बँकांनी दि. १, एप्रिल, २०१५ पासून थांबविले आहे, व संबंधित स्वातंत्र्यसैनिकाचे पीपीओ परत केले आहेत, अशा प्रकरणी जिल्हाधिकारी यांनी त्या स्वातंत्र्य सैनिकांची माहिती प्रणालीमध्ये भरुन पेन्शनचे प्रदान करण्यासाठी कोषागारांना कळवावे. जेथे बँकांनी पीपीओ परत न करता केवळ दि. १.४.२०१५ पासून पेन्शन थांबविल्याचे कळविले आहे. अशा प्रकरणी दि.१५.१२.२०१४ च्या शासन परिपत्रकासोबतच्या विहीत नमुन्यातील प्रमाणपत्र बँकेकडून घेऊन जिल्हाधिकारी यांनी स्वातंत्र्यसैनिक पेन्शनचे प्रदान तात्काळ व त्यानंतर स्वातंत्र्यसैनिकाची माहिती प्रणालीवर भरुन ती कोषागारांकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठवावी.

२. राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतनधारकांची प्रदाने दि. १.४.२०१५ पासून कोषागारांमार्फत करण्याचा निर्णय दि.१०.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला होता. परंतू या संदर्भात बहुतेक जिल्हाधिकारी कार्यालयांनी स्वातंत्र्य सैनिक पेन्शन संदर्भातील पीपीओ/माहिती (Data) जिल्हा कोषागार कार्यालयांना उपलब्ध करुन दिलेली नाही. त्यामुळे दि. १.४.२०१५ पासून स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन व इतर प्रदाने कोषागारामार्फत करण्यास अडचण होऊ नये, म्हणून शासन परिपत्रक दि. ३१.३.२०१५ अन्वये यासंदर्भात दि. १. जून,२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. परंतू अद्यापही

बहुतेक जिल्हाधिकारी कार्यालयांनी स्वातंत्र्य सैनिक पेन्शन संदर्भातील पीपीओ/माहिती (Data) जिल्हा कोषागार कार्यालयांना उपलब्ध करुन दिलेली नाही, ही बाब विचारात घेता, स्वातंत्र्यसैनिकाचे निवृत्तीवेतन व इतर प्रदाने कोषागारामार्फत करण्यास अडचण होऊ नये, यास्तव सर्व जिल्हाधिकारी व कोषागार अधिकारी यांनी निवृत्तीवेतन व इतर प्रदाने कोषागारामार्फत करण्यासाठी आवश्यक असलेली कार्यवाही आगामी २ महिन्यात पूर्ण करावी व दि. १ ऑगस्ट, २०१५ पासून सर्व प्रदाने जिल्हा कोषागारामार्फत करण्यात यावीत.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०९१३५२११४२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hanmant Jagganath Rasal

Digitally signed by Hanmant Jagganath Rasal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hanmant Jagganath Rasal
Date: 2015.06.09 13:56:00 +05'30'

**(ह. ज. रसाळ)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखाकार कार्यालय मुंबई/नागपूर
२) सर्व विभागीय आयुक्त,
३) सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य,
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) सह संचालक (सुधारणा), लेखा व कोषागार संचालनालय, नविन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
८) निवड नस्ती (स्वासैक-१).